**गिरणा प्रकल्पांतर्गत नाशिक जिल्हयातील नांदगांव व मालेगांव तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१६/४४९/प्र.क्र.७२/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २७/१२/२०१६

**वाचा -**

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण २०११/प्र.क्र.८० (भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए-२०१५/प्र.क्र.२१४/र-१, दि. २३/०९/२०१५
७) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि. १६/१२/२०१५
८) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
९) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र: पुनर्व/कार्या-९(३)/गिरणा/१४, दि. ३१/०७/२०१४
१०) शासन पत्र क्र : आरपीए-२०१६/प्र.क्र.२२/र-८, दि. २७/०४/२०१६
११) कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग, जळगांव यांचे पत्र क्र:प्रशा-५/३६४७/२०१६ दि. २२/०९/२०१६

**प्रस्तावना -**

कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग, जळगांव यांनी संदर्भाधिन पत्र क्र. ११ अन्वये गिरणा प्रकल्पांतर्गत नाशिक जिल्हयातील नांदगांव व मालेगांव तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील शेती पोहोच रस्ता वगळून एकूण २५ नागरी सुविधा कामांची रु. ३,५९,१०,४७५/- एवढया रकमेची अंदाजपत्रके संदर्भांकित क्र. १० रोजीच्या शासन पत्रान्वये कळविण्यात आल्यानुसार चालू दरसूचीनुसार अद्ययावत करुन प्रशासकीय मान्यतेस्तव प्रस्ताव शासनास सादर केला होता.

**२.** याबाबत शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ अन्वये प्रदान व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२)(अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार, सन १९७६ पूर्वीच्या प्रकल्पातील पुनर्वसित गावांना नागरी सुविधा पुरविणे या योजनेअंतर्गत नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत शासन निर्णय क्र. संकिर्ण २०११/प्र.क्र.८०(भाग-२)/र-८, दि.२५/०७/२०१३ निर्गमित करण्यात आला आहे.

तदनंतर संदर्भाधिन क्र. ५ व ८ च्या शासन निर्णयांन्वये वित्त विभागाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच अंतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात आल्या आहेत. सदर सुधारणांनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार सदर प्रस्तावामध्ये नमूद नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

**त्यानुसार, गिरणा प्रकल्पांतर्गत नाशिक जिल्हयातील नांदगांव व मालेगांव तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद नागरी सुविधांच्या २५ कामांच्या एकूण रू. ३,५९,१०,४७५/- ( अक्षरी रूपये तीन कोटी एकोनसाठ लक्ष दहा हजार चारशे पंचाहत्तर फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१) प्रस्तावात समाविष्ट असलेल्या कामांकरिता गौण खनिज स्वामित्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यन्वयीन यंत्रणेची राहील.

२) शासन निर्णय क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१ दि.१/८/२००९ व दि.२८/३/२०११ अन्वये पुनर्वसित/विस्तारीत गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकापेक्षा/विहीत मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेनुसार असावी. तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहीत कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तीचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मधील कलम (१८) अन्वये प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, नाशिक यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हापरिषदेकडे तातडीने हस्तांतरित कराव्यात.

६) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची प्रकल्प यंत्रणेने दक्षता घ्यावी.

२. <u>निविदा प्रक्रिया व कार्यारंभ आदेश :-</u>

**अ)** कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग, जळगांव यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावी.

**ब)** प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांच्या निविदा प्रक्रियेस संबंधित पाटबंधारे विकास महामंडळ यांचेकडून पूर्वपरवानगी व मान्यता घेण्याची आवश्यकता असणार नाही.

**क)** प्रस्तावाधीन पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन देण्यात येणार असल्यामुळे निविदा स्वीकृतीनंतर कार्यारंभ आदेश देण्यासाठी, संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून निविदा सांकेतांक घेण्याची आवश्यकता नाही.

ड) कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग, जळगांव यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

३. कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग, जळगांव यांनी वरील क्र. २ नुसार सुरु करण्यात आलेल्या निविदा प्राप्त नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल(Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल ( Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०१६-२०१७ या चालू वित्तीय वर्षाच्या उर्वरित कालावधीत निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार " मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी. सदर निधी मागणीसोबत गिरणा प्रकल्पांतर्गत नाशिक जिल्हयातील नांदगांव व मालेगांव तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना यापुर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने प्रलंबित उपयोजन प्रमाणपत्रे (Utilisation Certificates) सादर करावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२७१२१८५१७४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2016.12.27 12:27:05 +05'30'

**( प्रविण रा. मुंढे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) नाशिक विभाग, नाशिक
२. उप आयुक्त (पुनर्वसन), नाशिक
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक नाशिक
४. अधिक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव
५. कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग, जळगांव
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
९. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन ) नाशिक
१०. जलसंपदा विभाग /मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.
११. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१३. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. महसूल व वन विभाग, पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय, मुंबई ३२.
१५. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * * * *

शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: पुनर्व-२०१६/४४९/प्र.क्र.७२/र-८ दि. २७/१२/२०१६ सोबतचे विवरणपत्र
गिरणा प्रकल्पांतर्गत नाशिक जिल्हयातील नांदगांव व मालेगांव तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील प्रशासकीय मान्यता प्रदान एकूण २५ नागरी सुविधा कामांचा तपशील

| अ.क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| अ) ता. नांदगांव, जि. नाशिक | | | |
| १ | नवे पांझण | दहनभूमी | ५,२४,१२३/- |
| २ | नवे पांझण | गुरांसाठी पाण्याचा हौद | ५,७४,४१४/- |
| ३ | नवे पांझण | उघडी गटारे | ४०,८९,७८०/- |
| | | एकूणात (अ) | **रु. ५१,८८,३१७/-** |
| ब) ता. मालेगांव, जि.नाशिक | | | |
| ४ | खायदे | बसथांबा | १,८९,०१४/- |
| ५ | खायदे | उघडी गटारे | ६५,१०,५८७/- |
| ६ | अजंदे भुईगव्हाण | दहनभूमी | ४,६५,५९५/- |
| ७ | अजंदे भुईगव्हाण | गुरांसाठी पाण्याचा हौद | ५,७७,५०४/- |
| ८ | अजंदे भुईगव्हाण | शौचकुप संच (२) | ७,८५,८२६/- |
| ९ | अजंदे भुईगव्हाण | बसथांबा | १,८९,१८७/- |
| १० | अजंदे भुईगव्हाण | उघडी गटारे | ६४,८९,१०८/- |
| ११ | उमरदे | दहनभूमी | ३,१७,३०४/- |
| १२ | उमरदे | गुरांसाठी पाण्याचा हौद | ५,८१,४०३/- |
| १३ | उमरदे | शौचकुप संच (२) | ७,९४,७१८/- |
| १४ | उमरदे | बसथांबा | १,९२,५०१/- |
| १५ | उमरदे | उघडी गटारे | ४९,६२,०३४/- |
| १६ | अजंदेपाडा | दहनभूमी | ३,७५,३०१/- |
| १७ | अजंदेपाडा | गुरांसाठी पाण्याचा हौद | ५,८६,६७६/- |
| १८ | अजंदेपाडा | शौचकुप संच (२) | ८,०२,१११/- |
| १९ | अजंदेपाडा | उघडी गटारे | १७,३९,९५४/- |
| २० | अजंदेपाडा | बसथांबा | १,९५,३७२/- |
| २१ | रोंझाणे | दहनभूमी | ३,२१,१७६/- |
| २२ | रोंझाणे | गुरांसाठी पाण्याचा हौद | ५,८१,८६३/- |
| २३ | रोंझाणे | शौचकुप संच (२) | ७,९६,४१४/- |
| २४ | रोंझाणे | उघडी गटारे | ३०,७६,३६२/- |
| २५ | रोंझाणे | बसथांबा | १,९२,१४८/- |
| | | एकूणात (ब) | **रु. ३,०७,२२,१५८/-** |
| | | एकूणात एकूण (अ+ब) | **रु. ३,५९,१०,४७५/-** |

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2016.12.27 12:28:38 +05'30'

( प्रविण रा. मुंढे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन